महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य, पुणे या समितीचे पुर्नगठन करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन निर्णय क्रमांक: लोसास २०२०/प्र.क्र.४३/आस्था-२**
मंत्रालय विस्तार इमारत,
मुंबई-४०० ०३२
दिनांक: १७ जुलै,२०२३

वाचा -

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: समिती-२५१४/(प्र.क्र.८६/१४)/समन्वय, दिनांक ०६.०९.२०१४.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक: समिती-२५१४/(प्र.क्र.८६/१४)/समन्वय, दिनांक ०८.१०.२०१८.

प्रस्तावना-

मराठी प्रदेशातील लोकसाहित्याचे संशोधन करणे,या संदर्भात सल्ला देणे व असे लोकसाहित्य प्रकाशित करण्यासाठी शासनाकडे प्रस्तावित करण्याकरिता उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.समिती २५१४/प्र.क्र.८६/१४/समन्वय दिनांक ६.९.२०१४ अन्वये महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती ,पुणे या समितीची पुनर्रचना करून लोकसाहित्य समितीची स्थापना करण्यात आली होती तसेच उर्वरित कामे पूर्ण करण्यासाठी शासन निर्णय दिनांक ०८.१०.२०१८ अन्वये या समितीस दिनांक ३१.१२.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर समितीचा कालावधी दिनांक ३१.१२.२०१८ रोजी संपुष्टात आल्यानंतर या समितीचे पुर्नगठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य, पुणे या समितीचे पुर्नगठन करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सदर समितीची रचना पुढील प्रमाणे राहील:-

| अ.क्र. | समितीवरील मान्यवर | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | शाहीर हेमंत मावळे ,पुणे | अध्यक्ष |
| २ | श्रीमती. मोनिका ठक्कर ,ठाणे | सदस्य |
| ३ | श्री.गणेश चंदनशिवे ,ठाणे | सदस्य |
| ४ | श्री.शेखर निरंजन भाकरे ,संभाजीनगर | सदस्य |
| ५ | श्री.मार्तंड कुलकर्णी, किनवट,जि.नांदेड | सदस्य |
| ६ | श्री. प्रणव पाटील, पुणे | सदस्य |
| ७ | डॉ.संगीता बर्वे ,पुणे | सदस्य |
| ८ | श्री. प्रकाश खांडगे ,ठाणे | सदस्य |
| ९ | श्री. भावार्थ रामचंद्र देखणे ,पुणे | सदस्य सचिव |

२. सदर समितीची मुदत सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षापर्यंत राहील.

३. मराठी प्रदेशातील लोकसाहिताचे संशोधन करणे या संदर्भात शासनास सल्ला देणे व असे लोकसाहित्य प्रकाशित करण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव पाठविणे हे या समितीचे कार्य राहिल. तसेच सदर समितीचे

मुख्यालय पुणे येथे असेल. सदर समितीच्या खर्चासाठी विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण पुणे विभाग, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी आणि संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त समितीमधील अशासकीय सदस्य/सदस्य सचिवांना उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. अभिमी-२०२२ प्र.क्र. ४०/आस्था-२ दि. ०८ जून २०२२ नुसार अनुज्ञेय प्रवासभता, दैनिक भत्ता व बैठक भत्ता लागू राहील.

५. महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती महाराष्ट्र राज्य पुणे या समितीसाठी येणारा खर्च मागणी क्र. एन-३, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष सहाय्य योजना (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(०१) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्यांचे प्रकाशन (कार्यक्रम) लेखाशीर्ष-(२२०५३६२६) या लेखाशिर्षाखालील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०७१७१३३०२९०८०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2023.07.17 13:31:52 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री (१) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (२) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
६. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय मुंबई.
८. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे.
१०. सर्व सदस्य, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती, महाराष्ट्र राज्य,पुणे (उच्च शिक्षण संचालनालया मार्फत).
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (कार्यासन विघयो), मंत्रालय, मुंबई.
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - ॥ मुंबई/नागपूर.
१४. निवडनस्ती (आस्था-२).